"वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" (योजनेत्तर) या योजनेतील १८८ अस्थायी पदांना सन २०२४-२५ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.२२/२/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०७ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.२१.०९.२०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२४/फ-९, दि.१०.०३.२०२३
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२३
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२४/फ-९, दि.२५.०९.२०२३
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४
८. उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३ /योजनेत्तर/प्र.क्र.४१ (२३-२४)/२७७, दिनांक २७.०२.२०२४

**शासन निर्णय :-**

उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.८ अन्वये "वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत १८८ अस्थायी पदांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे. वाचा येथील क्र.२ च्या सुधारीत आकृतीबंधाचे पुर्नगठनप्रमाणे वन विभागाच्या एकूण २६५७३ पदांमध्ये या योजनेतील १८८ पदांचा समावेश आहे.

यापूर्वी वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.३ व ५ येथील नमूद शासन निर्णयास अनुसरुन महसूल व वन विभागच्या वाचा येथील क्र.४ व ६ च्या शासन निर्णयान्वये "वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत १८८ अस्थायी पदांना सन २०२३-२४ मध्ये दिनांक ०१.०३.२०२३ ते २९.०२.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.७ च्या दिनांक २१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यानुसार "वनसमुपयोजन व कंत्राटदारांचे उच्चाटन" या योजनेत्तर योजनेखालील कार्यरत १८८ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ वाचा येथील क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर पदांवर होणारा खर्च, मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१-वनीकरण, १०५-वनोत्पादन, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजना, (०१)(०३) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (इमारतीचे लाकूड) (२४०६ ०४७२) ०१ वेतन या लेखा शिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१८०८१६७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af916
32f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff8
8c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.07 18:17:20 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), मुंबई / नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट व अमरावती.
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ / चंद्रपूर / नागपूर / अमरावती / गडचिरोली/कोल्हापूर वनवृत्त.
८. वनसंरक्षक, वाहतूक व विपणन विभाग बल्लारशाहा.
९. उपवनसंरक्षक यवतमाळ, पांढरकवडा, नागपूर, ब्रम्हपूरी, मध्य चांदा, बुलढाणा, पूसद, वणी, कोल्हापूर, सातारा, सावंतवाडी, वर्धा, भंडारा, गोंदिया, पश्चिम मेळघाट, चिखलदरा, पूर्व मेळघाट, अमरावती वन विभाग
१०. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११. वित्त विभाग, व्यय-१०/वित्तिय सुधारणा- १ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. कार्यासन अधिकारी फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१३. कक्ष अधिकारी ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१४. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. (निवडनस्ती)

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२४/प्र.क्र.२२/२/फ-९, दिनांक ०७ मार्च, २०२४**
**सोबतचे विवरणपत्र**
**(दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | प्रकाष्ठ निष्कासन अधिकारी | १ |
| २ | सहा.वनसंरक्षक | २ |
| ३ | वनक्षेत्रपाल | ६ |
| ४ | वनपाल | ४१ |
| ५ | वनरक्षक | ८१ |
| ६ | सहायक यांत्रिकी | २ |
| ७ | भांडारपाल | १ |
| ८ | लेंथमन | १ |
| ९ | यांत्रिकी | १ |
| १० | भांडार लिपीक | १ |
| ११ | लोहार | १ |
| १२ | जोडारी | २ |
| १३ | लिपीक | १ |
| १४ | पहारेकरी | ४ |
| १५ | जीप चालक ट्रक / ट्रॅक्टर चालक | २६ |
| १६ | चौकीदार | २ |
| १७ | ट्रॅक्टर स्वच्छक | ७ |
| १८ | मालमोटार स्वच्छक | ५ |
| १९ | सांधाता | १ |
| २० | खलाशी | १ |
| २१ | महावत | १ |
| | **एकूण:-** | १८८ |

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001,
st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.07 18:17:41 +05'30'

( विवेक होशिंग )
उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन